नॅशनल जेल मॅन्युअलशी सुसंगत एकाच परिसरात (कॉम्प्लेक्समध्ये) कारागृह , दवाखाना व कोर्ट तयार करणेकरीता अभ्यास करून शासनास शिफारशी करणेसाठी सचिव समिती गठीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

## शासन निर्णय क्रमांकः जेएलएम-१०१५/प्र.क्र.६६/तुरुंग-२

, दुसरा मजला, मुख्य इमारत,हुतात्मा राजगुरु चौक
मादाम कामा रोड, मंत्रालय मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०२ डिसेंबर, २०१६

**शासन निर्णय:-**

राज्यातील बऱ्याच कारागृहांमध्ये कैद्यांची संख्या अधिकृत क्षमतेपेक्षा जास्त असल्याने त्यांना कारागृहात ठेवण्यास जागा कमी पडते. नॅशनल जेल मॅन्युअलमध्ये जेलची जागा, सोयी सुविधा या सर्व गोष्टी निश्चित करण्यात आल्या आहेत. तथापि, महाराष्ट्रातील बहुतांश कारागृहाचे बांधकाम हे इंग्रजांच्या काळातील जुने असल्याने जेल मॅन्युअलप्रमाणे कार्यवाही करण्यात खूप मर्यादा येतात. जेलमधून कैदयांना कोर्टामध्ये पेशीसाठी घेऊन जाणे हे फार जिकरीचे काम आहे. मा. उच्च न्यायालयाने देखील तुरुंग हे पोलीस स्टेशन, दवाखाना व न्यायालय यांच्याजवळच्या अंतरावर असावेत, असे वेळोवेळी सूचित केले आहे. तरी त्यानुसार कार्यवाही कशाप्रकारे करता येणे शक्य आहे, तशी कार्यवाही नॅशनल जेल मॅन्युअल मधील तरतुदींशी सुसंगत कशी ठरु शकेल, याबाबत अभ्यास करून त्यानुषंगाने शासनास शिफारशी करण्याकरिता समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे समिती गठित करीत आहे.

१. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा),गृह विभाग, मंत्रालय -अध्यक्ष
२. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग,मंत्रालय - सदस्य
३. प्रधान सचिव, गृहनिर्माण व विशेष सहाय विभाग,मंत्रालय -सदस्य
४. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई - सदस्य
५ अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक ,कारागृह व सुधारसेवा,पुणे - सदस्य
६. व्यवस्थापकीय संचालक, सिडको - सदस्य
७. व्यवस्थापकीय संचालक, म्हाडा - सदस्य
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग -सदस्य
९. विशेष पोलीस महानिरीक्षक व कारागृह उपमहानिरीक्षक , दक्षिण विभाग, मुंबई -सदस्य
१०.उपसचिव (तुरुंग), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -सदस्य सचिव

वर नमूद केल्याप्रमाणे नॅशनल जेल मॅन्युअल मधील तरतूदीनुसार कारागृहांचे कामकाज सोयीस्कर व गतिमान कसे करता येईल,याबाबतचा अभ्यास करून सदर समिती तिचा अहवाल समितीच्या स्थापनेपासून एक महिन्याच्या आत शासनास सादर करील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१६१२०२१७४३३५३१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2016.12.02 17:46:37 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. प्रधान सचिव (अपील व सुरक्षा) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय,मुंबई
२. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय ,मुंबई
३. प्रधान सचिव, गृहनिर्माण व विशेष सहाय विभाग, यांचे स्वीय सहायक,मंत्रालय मुंबई
४. आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
५ अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक ,कारागृह व सुधारसेवा , पुणे
६. व्यवस्थापकीय संचालक, सिडको ,मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, म्हाडा,मुंबई
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई
९. विशेष पोलीस महानिरीक्षक व कारागृह उपमहानिरीक्षक , दक्षिण विभाग, मुंबई
१०. उपसचिव (तुरुंग), यांचे स्वीय सहायक,गृह विभाग, मंत्रालय, मुंबई